**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-१२१६/प्र.क्र.८०२/पोल-७.**
मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०१७.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिकारक्षेत्रातील वांद्रे (पश्चिम) व सांताक्रूझ (पश्चिम) येथील पोलीस वसाहतींमधील इमारतींच्या दुरुस्तीची विविध कामे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/कक्ष-८(११)/शा.२०२/२०१६, दिनांक २९.०६.२०१६.

**ज्ञापन** :-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे वांद्रे (पश्चिम) व सांताक्रूझ (पश्चिम) येथील पोलीस वसाहतींमधील इमारतींच्या दुरुस्तीची विविध कामे करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

**२.** उक्त कामासाठी उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, अंधेरी, मुंबई, यांनी सन २०१६-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.२,२०,६८,३९५/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उत्तर मुंबई, यांनी सांक्षाकित केले आहेत.

**३.** उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते पुढीलप्रमाणे सुधारित केले आहेत आणि प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १. | Providing pathway, plinth protection, paver blocks and drainage line at Santacruz—16 PSI Quarters and Six Blocks at Santacruz (West). | रु.३७,९१,९९२/- |
| २. | Providing pathway, plinth protection, paver blocks and drainage line at Santacruz Police Station, Six Blocks, 18 PSI Quarters and SRPF building area at Santacruz (West). | रु.५०,५८,८१५/- |
| ३. | Providing pathway, plinth protection, paver blocks and inspection chamber in the premises at Waterfield Road at Building No. A, B, F and G. | रु.३४,३७,७२८/- |
| ४. | Providing pathway, plinth protection, paver blocks and inspection chamber in the premises at Waterfield Road at Building No. C, D, and E at Bandra (West). | रु.५०,१३,५४४/- |

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| ५. | Providing pathway, plinth protection, paver blocks and drainage line at Carter Road, Bandra (West)—32 PSI Quarters, 10 PI Quarters and Eight PI Quarters | रु.३६,६५,९४०/- |
| **एकूण** | | **रु.२,०९,६८,०१९/-** |

४. त्या अनुसार, परिच्छेद ३ मधील तक्यातील स्तंभ (२) मध्ये विनिर्दिष्ट केलेली कामे करण्यासाठी स्तंभ (३) मध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे एकूण **रु.२,०९,६८,०१९/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा बी-१, मुख्य लेखाशीर्ष, २०५५, पोलीस (०२), शहर पोलीस, शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, या लेखाशी़र्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५५५/इमा-२, दिनांक २३.१२.२०१६, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०४१२१४५५५३६६२९ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.04.12 14:58:49 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उत्तर मुंबई, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).